**मौजे बनोटी, ता. सोयगाव, जि. छ. संभाजीनगर येथील शिवना नदीकाठी पूर संरक्षक भिंतीच्या कामाच्या अंदाजपत्रकाच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

शासन निर्णय क्रमांक: पुसंभि-**२०२३**/ (**प्र.क्र. ३५७/२०२३/ सिं.व्य.**(**महसूल**)

मंत्रालय, मुंबई ४०००३२,

दिनांक: १५ मार्च २०२४

**वाचा :** १) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू १०९२/१७०-सिंव्य,(कामे) दिनांक ७/०८/१९९२

२) शासन निर्णय क्र. पूसंभि २०१९/(प्र.क्र.११५/२०१९) सिंव्य.(म) दि.३१/८/२०१९

**प्रस्तावना :-**

मौजे बनोटी, ता. सोयगाव, जि. छ. संभाजीनगर येथे हिवरा नदीच्या पात्रामध्ये मोठया प्रमाणात अतिक्रमण झाल्यामुळे पुरपरिस्थितीमध्ये पुराचे पाणी लोकवस्तीमध्ये जाऊन जिवित हानी होवू नये या दृष्टीकोनातून नदीच्या प्रवाहाच्या डाव्या बाजूच्या पूरसंरक्षक भिंत बांधकाम प्रस्तावित केले आहे. शेतीचे रक्षण करण्याकरिता पूर संरक्षक भिंतीचे काम करुन मिळणेबाबत स्थानिक लोकप्रतिनिधी यांनी मागणी केलेली आहे .

मौजे बनोटी, ता. सोयगाव, जि. छ. संभाजीनगर, येथे प्रस्तावित ठिकाणी क्षेत्रीय कार्यालयाने प्रत्यक्ष पाहणी करून पूर संरक्षक भिंतीच्या कामाचे अंदाजपत्रक शासनास सादर करण्यात आले आहे. मौजे बनोटी, ता. सोयगाव, जि. छ. संभाजीनगर येथील हिवरा नदीकाठी पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गोदावरी मराठवाडा विकास महामंडळ, छ. संभाजीनगर अंतर्गत मौजे बनोटी, ता. सोयगाव, जि. छ. संभाजीनगर येथील हिवरा नदीच्या बाजूला पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास प्रस्तावित पूर संरक्षक भिंत बांधण्याच्या कामासाठी रु. ४,७०,१०,४४३/- (चार कोटी सत्तर लक्ष दहा हजार चारशे त्रेचाळीस रुपये)

एवढया खर्चाच्या जलसंपदा विभागाच्या सन २०२२-२३ व  सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन  राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

क) शासन निर्णय क्रमांक पुसंभि-२०१९/(प्र.क्र.११५/२०१९)/सिंव्य(म) दिनांक ३१/०८/२०१९ मधील तरतूदी नुसार कार्यवाही  करावी.

ख) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू - १०८९/२४३/८९/सिंव्य(कामे), दि.२१/०९/१९८९ व दि. ०३/०५/२०१८ नुसार पूर रेषा आखणी केल्यानंतरच पूर संरक्षक भिंतीची संरेखा निश्चित करावी. पूररेषा आखणी केल्याशिवाय कामे हाती घेण्यात येवू नयेत.

ग) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे /संकल्पने, दरसूची बाहय बाबी  व  वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी. कामाचे संकल्पन सक्षम स्तरावरुन मान्यता घेऊनच तांत्रिक मान्यतेची कार्यवाही करण्यात यावी. सदर संकल्पनामुळे कामाच्या किंमतीत अथवा कार्यकक्षेत बदल होत असल्यास त्यास सक्षम स्तरावर मान्यता घेणे अनिवार्य राहील.

घ) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करावयाचा आहे. या कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता दिली जाणार नाही.

च) भिंतीच्या बांधकामासाठी भूसंपादन करू नये, बांधकामासाठी आवश्यक जमीन संबंधितांनी विनामोबदला उपलब्ध करून द्यावी, पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदीप्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही याची, दक्षता घ्यावी.

छ) पूर संरक्षक योजना राबविल्यानंतर परिसरातील पाण्याचा निचरा योग्य पध्दतीने होईल, याची दक्षता नियोजनात घ्यावी.

ज)  सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक मौजे बनोटी, ता. सोयगाव, जि. छ. संभाजीनगर येथील वारणा नदीकाठी पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास बनोटी, ता. सोयगाव, जि. छ. संभाजीनगर ने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दुरूस्ती करावयाची आहे. तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र   प्राप्त करून घेण्याची जबाबदारी सक्षम अधिका-यांची असेल.

झ) काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

ट) सदरहू कामास तांत्रिक मंजुरी देण्यापूर्वी संदर्भ क्र. २ मधील शासन निर्णयातील अटींचे कोटेकोरपणे पालन करावे. सदरच्या ठिकाणी पूररेषा निश्चितीची कार्यवाही पूर्ण झाल्याखेरीज या कामांस तांत्रिक मंजुरी देता येणार नाही.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च "४७११ पुरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०१) गोदावरी मराठवाडा विकास महामंडळ, छ. संभाजीनगर भागभांडवली अंशदान (४७११ ०२३६)" या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसुल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ३७/ सन २०२४ वर नोंदविण्यात आलेली आहे.

वित्तीय अधिकार नियमपुस्तिका - १९७८ भाग पहिला मधील तरतुदीनंतर प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार व आंतरवित्तीय सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२४०३१६१८४९४९९८२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SONAL ANAND GAIKWAD

Digitally signed by SONAL ANAND GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=2de9efbff657631a65d78997e0ca3abe497df4a58a3780cae2980bef45f5c5e1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F9F2A1323FB2F904BB9F38B4E7461B2C05FBB18A306A192E2149168DAABEC890, cn=SONAL ANAND GAIKWAD
Date: 2024.03.16 18:59:03 +05'30'

**(सो.आ.गायकवाड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे अपर मुख्य सचिव, मुंबई.

२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुंबई.

३) मा. उपमुख्यमंत्री (जलसंपदा/वित्त व नियोजन) यांचे कार्यालय.

४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई

५) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई

६)  मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई

७)  मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

८)  प्रधानसचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

९)  सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०) महालेखापाल-१ (लेखा वअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,

११) महालेखापाल-२ (लेखा वअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,

१२) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा विकास महामंडळ, छ. संभाजीनगर,

१४) मुख्य अभियंता, (जसं), जलसंपदा विभाग, छ. संभाजीनगर

१५) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

१६) अधीक्षक अभियंता, छ. संभाजीनगर पाटबंधारे मंडळ, छ. संभाजीनगर

१७) सिं.व्य. (महसूल) कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : पुसंभि-२०२३/ (प्र.क्र.३५७/२०२३)/ सिंव्य (महसूल),**

**दि. १५ मार्च २०२४ चे सहपत्र**

**परिशिष्ट**

| Sr.No. | Description of Item | Amount |
|---|---|---|
| १ | Amount of Main work | ३८०१२९२८.०० |
| २ | १ % Insurance | ३८०१२९.०० |
| ३ | Add १८ % for GST | ६८४२३२७.०० |
| ४ | Add २ % Contingencies | ७६०२५९.०० |
| ५ | Royalty charges | १०१४८००.०० |
| | Total Amount | ४७०१०४४३.०० |

SONAL ANAND GAIKWAD

Digitally signed by SONAL ANAND GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=2de9efbff657631a65d78997e0ca3abe497df4a58a3780cae2980bef45f5c5e1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F9F2A1323FB2F904BB9F38B4E7461B2C05FBB18A306A192E2149168DAABEC890, cn=SONAL ANAND GAIKWAD
Date: 2024.03.16 19:06:12 +05'30'

**( सो.आ.गायकवाड )**
**शासनाच्या अवर सचिव**